**महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पाकरीता सेवा पुरवठादाराची दहा वर्षाच्या कालावधीकरीता पीपीपी तत्वावर नेमणूक करण्याकरीता ई-निविदा करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः ईएमएस -२०२३/प्र.क्र.०२/आरोग्य-३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : ०४ ऑगस्ट, २०२३.

वाचा :

१) **आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक- राआसो/ईएमएस/०१-०३/२३, दि.०३.०४.२०२३**

२) **मा.मंत्रीमंडळाचा निर्णय दिनांक-२१ जुलै,२०२३ आणि इतिवृत्त दि.२७ जुलै,२०२३.**

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पांतर्गत (टोल फ्री क्रमांक १०८) २५५ अॅडव्हान्स सर्पोटिंग रुग्णवाहिका (एएलएस) आणि १२७४ बेसीक लाईफ सपोर्टींग रुग्णवाहिका (बीएलएस) अश्या एकूण १५२९ रुग्णवाहिकां , नवजात अर्भक रुग्णवाहिका, बोट रुग्णवाहिका, मोटारबाईक आपत्कालीन सेवा वाहन राज्यात सुरु करण्याकरीता सेवापुरवठादाराची नेमणूक करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पातंर्गत २५५ अॅडव्हान्स लाईफ सर्पोटिंग रुग्णवाहिका (एएलएस) आणि १२७४ बेसीक लाईफ सपोर्टींग रुग्णवाहिका (बीएलएस) अश्या एकूण १५२९ रुग्णवाहिकां, नवजात अर्भक रुग्णवाहिका-३६, बोट रुग्णवाहिका-२५, मोटारबाईक-१९६ या प्रकारे विविध आपत्कालीन सेवा वाहन या माध्यमाव्दारे आपत्कालीन प्रतिसाद सेवा पुरवठादाराची १० वर्षाकरीता पीपीपी तत्वावर नेमूणक करण्याकरीता होणाऱ्या रु.७५९,५६,५१,१९०/- (अक्षरी रु. सातशे

एकोणसाठ कोटी छप्पन्न लाख एकावन्न हजार एकशे नव्वद फक्त) इतक्या अंदाजित रक्कमेच्या वार्षिक खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा पुरविण्यात येणाऱ्या विविध सेवांचा भांडवली व आवर्ती खर्चाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अनु.क्र. | सेवेचा तपशिल | रुग्ण-वाहिका संख्या | प्रती रुग्णवाहिका भांडवली खर्च (अंदाजित) | एकूण रुग्णवाहिकांचा भांडवली खर्च (अंदाजित) (३ x ४) | भांडवली खर्चाची १० वर्षात विभागाणी केल्यास होणारी रक्कम | आवर्ती खर्च प्रती रुग्ण-वाहिका | आवर्ती खर्च वार्षिक (अंदाजित) (३x७) | एकूण बाह्यस्रोताद्वारे अपेक्षित वार्षिक खर्च (अंदाजित) (६+८) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | आपत्कालीन वैद्यकीय सेवा रुग्णवाहिका | ALS-२५५ | ४८७१७९० | १२४२३०६४५० | १२४२३०६४५ | ३७०४८५ | ११३३६८४१०० | १२५७९१४७४५ |
| | | BLS-१२७४ | ३०२७७४५ | ३८५७३४७१३० | ३८५७३४७१३ | ३४५५३६ | ५२८२५५४३६८ | ५६६८२८९०८१ |
| २ | मोटार बाईक रुग्णवाहिका | १९६ | २५०००० | ४९०००००० | ४९००००० | १०५००० | २४६९६०००० | २५१८६०००० |
| ३ | बोट रुग्णवाहिका | २५ | १८०००००० | ४५०००००० | ४५००००० | ६४९९९८ | १९४९९९४०० | २३९९९९४०० |
| ४ | नवजात अर्भक रुग्णवाहिका | ३६ | ४८७१७९० | १७५३८४४४० | १७५३८४४४ | ३७०४८५ | १६००४९५२० | १७७५८७९६४ |
| एकूण | | | | **५७७४०३८०२०** | **५७७४०३८०२** | **१८४१५०४** | **७०१८२४७३८८** | **७५९५६५११९०** |

३. सदर प्रशासकीय मान्यता खालील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती-:**

१) शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये वार्षिक खर्च १०.०० लक्षापेक्षा जास्त असल्याने ई-निविदा प्रणालीचा वापर करणे बंधनकारक करण्यात आले आहे. परंतु, शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग दिनांक २४ ऑगस्ट,२०१७ अन्वये वस्तू व सेवा खरेदीसाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) पोर्टल अनुसरायाची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचनांनुसार निविदेची कार्यवाही करण्यात यावी, सदर पोर्टलवर

प्रतिसाद न मिळाल्यास शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग दि.०१.१२.२०१६ नुसार कार्यवाही करावी.

२) महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पांतर्गत असलेल्या २५५ ॲडव्हान्स सर्पोटींग रुग्णवाहिका (एएलएस) आणि १२७४ बेसीक लाईफ सपोर्टींग रुग्णवाहिका (बीएलएस) अश्या एकूण १५२९ रुग्णवाहिकांसाठी सेवा, नवजात अर्भक रुग्णवाहिका-३६ , मोटरबाईक आपत्कालीन वाहन-१९६, बोट रुग्णवाहिका-२५ या सेवांकरीता सेवापुरवठादाराची नेमणूक करणे या बाबींची आवश्यकता/मागणी यांची शहानिशा/खातरजमा करण्यात आलेली असून प्रस्तावित खरेदीचे प्रमाण (Quantity) मागणीनुसार योग्य आहे.

३) महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पांतर्गत विविध माध्यमाव्दारे रुग्णांना सेवा देण्याकरीता सेवा पुरवठादाराची नेमणूक करणे या बाबींची रुग्णसेवेसाठी आवश्यकता असून या बाबींचा विनियोग विहीत मुदतीत करण्यात येणार आहे.

४) वरील बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधित तज्ञांनी तयार केलेले असून ते गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अश्या रितीने तयार करण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५) प्रशासकीय मान्यता देतांना प्रस्तावित खरेदीचे दर अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) सदर सेवा/सुविधेची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

७) शासन निर्णय, वित्त विभाग क्रविअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

४. यावरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - १३ - कार्यालयीन खर्च या मुख्य लेखाशिर्षातून चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय मा.राज्य मंत्रिमंडळाची दि. २१ जुलै, २०२३ रोजी झालेल्या बैठकीतील विषय क्रं.१२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०४१२१२५०४५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.04 12:53:19 +05'30'

(अशोक आत्राम)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (आरोग्य),महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
४. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
६. सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
७. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२), मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).